**"महात्मा गांधी पथक्रांती योजना" ही योजना "अत्यावश्यक सार्वजनिक प्रकल्प" म्हणून घोषित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय,क्रमांक-मुंविप्र.२००८/प्र.क्र.५०/०८/वि.प्र.
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांकः- १ जानेवारी, २०१०.

संदर्भः- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग. क्रमांक-मुंविप्र-२००६/३६८/ प्र.क्र.७९/०६/वि.प्र., दि.१०.११.२००६ आणि दि.३१.१२.२००७.

**प्रस्तावना-**

बृहन्मुंबई शहरातील झोपडपट्टीवासियांपैकी अनेक कुटुंबे प्रमुख रस्त्यांवर वास्तव्य करीत आहेत व असे रस्ते/पदपथ दोन्ही बाजूला किंवा एका बाजूला झोपडपट्ट्यांनी व्यापलेले असल्यामुळे वाहतुकीस मोठ्या प्रमाणावर अडथळा निर्माण होतो. या रस्त्यांवर मोठ्या प्रमाणावर वाहतुक असल्याने, अनेकदा अपघात होऊन पदपथावर राहणाऱ्या व्यक्ती या अपघातांना बळी पडतात. तसेच सदर झोपडपट्ट्यांना आवश्यक त्या सुविधा पुरविणे महानगरपालिकेस शक्य होत नाही. मुंबई हे एक जागतिक दर्जाचे शहर बनविण्याच्यादृष्टीने शासन प्रयत्नशील असून यासंदर्भात बृहन्मुंबईतील रस्ते/पदपथावरील झोपडपट्टीवासियांचे इतर ठिकाणी रहिवाशी जागा व पायाभूत सुविधा देऊन पुनर्वसन करणे आणि रिकाम्या झालेल्या पदपथांची दुरुस्ती व सुशोभिकरण करुन रस्ते सुधारणेचे काम हाती घेण्याच्यादृष्टीने शासनाने संदर्भाधीन दिनांक १० नोव्हेंबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये 'महात्मा गांधी पथक्रांती योजना' राबविण्याबाबत निर्णय घेतला असून, संदर्भाधीन दिनांक ३१.१२.२००७ च्या शासन निर्णयान्वये यासंदर्भात सुधारित कालबध्द कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी मान्यता देण्यात आली आहे आणि बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत सदर योजनेची अंमलबजावणी करण्यांत येत आहे. या योजनेची यशस्वीरित्या अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने 'महात्मा गांधी पथक्रांती योजने'चा अत्यावश्यक सार्वजनिक प्रकल्पातंर्गत (Vital Public Project) समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. महात्मा गांधी पथक्रांती योजनेची अंमलबजावणी सुलभरितीने व यशस्वी होण्याच्यादृष्टीने सदर योजना ''अत्यावश्यक सार्वजनिक प्रकल्प'' (Vital Public Project) म्हणून घोषित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०१००१०४१५२००६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( रा.तु.जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, बृहन्मुंबई महागरपालिका, महापालिका मार्ग, मुंबई.
८) पोलीस आयुक्त, पोलीस आयुक्त कार्यालय, क्रॉफर्ड मार्केट जवळ, मुंबई.
९) सह पोलीस आयुक्त(वाहतूक), सर पोचखानवाला रोड, वरळी, मुंबई.
१०)अध्यक्ष, मुंबई पोर्ट ट्रस्ट, शुरजी वल्लभदास रोड, बॅलार्ड पियर, मुंबई.
११) उपाध्यक्ष, म्हाडा, म्हाडा भवन, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१२) मुख्य कार्य अधिकारी,झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,म्हाडा भवन ,बांद्रा(पूर्व), मुंबई-५१.
१३) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा-कुर्ला संकुल, मुंबई-५१.
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ,प्रियदर्शनी पार्क, नेपियन-सी रोड, मुंबई.
१५) सचिव (विशेष प्रकल्प) ,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रकल्प व्यवस्थापक, मुंबई ट्रान्सफॉर्मेशन सपोर्ट युनिट, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्थेचे कार्यालय, फोर्ट, मुंबई.
१७) जिल्हाधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई.
१८) प्रकल्प व्यवस्थापक तथा उपायुक्त, महात्मा गांधी पथक्रांती योजना, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१९) उपसचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती.

***